**नागपूर मध्यवर्ती कारागृहात फरश्या बसविणे या कामास येणाऱ्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१३१५/प्र.क्र.१७४/तुरुंग-२

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २८ जुलै, २०१५

**वाचा**

१) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.बीएलडी/१३विआ/नाजिका/फबसविणे/६३१५/कक्ष-६(३), दिनांक २२.०६.२०१५.

**प्रस्तावना**

नागपूर मध्यवर्ती कारागृहामध्ये बंद्याच्या सोई सुविधेमध्ये वाढ करण्यासाठी बॅरेक्समध्ये फरश्या बसविणे गरजेचे आहे. या कामाचे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर यांनी रुपये २९,९९,८०२/- इतक्या खर्चाचे तपासून व साक्षांकीत केलेली अंदाजपत्रके अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनाच्या प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केली आहेत. त्यास अनुसरुन याद्वारे शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय**

नागपूर मध्यवर्ती कारागृहामध्ये बंद्याच्या सोई सुविधेमध्ये वाढ करण्यासाठी बॅरेक्समध्ये फरश्या बसविणे, काही ठिकाणी वीट बांधकाम करणे, अंतर्गत व बाह्य गिलाव्याचे काम करणे व काही अत्यावश्यक दुरुस्त्या करणे या कामाचे छाननीअंती एकूण रुपये ३१,१९,८००/- (रुपये एकतीस लक्ष एकोणीस हजार आठशे फक्त) इतक्या अंदाजपत्रकास शासन प्रशासकीय मान्यता देत आहे.

२. सदरचे अंदाजपत्रक सन २०१४-१५ च्या दरसूचीवर आधारित असुन, सदर अंदाजपत्रकात आकस्मिक खर्चासाठी ४ टक्के तरतूद समाविष्ट करण्यात आली आहे.

३. यासाठी होणारा खर्च सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात मागणी क्र.बी-५, मुख्य लेखाशीर्ष-२०५६ (००)(१०१)-तुरुंग (००), (०२०)- १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार तुरुंगातील सोई सुविधामध्ये वाढ करणे, (२०५६ ०२६९) (केंद्र पुरस्कृत) योजनांतर्गत/दत्तमत, (५३)- मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम

पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग-पाच,अनुक्रमांक-३, नियम १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२८१६३४१०५०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jaysing L Pawara

Digitally signed by Jaysing L Pawara
DN: CN = Jaysing L Pawara, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.07.29 12:45:52 +05'30'

**( ज. ल. पावरा )**
उपसचिव, गृह विभाग

प्रत,

१. अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे,
२. कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय),महाराष्ट्र राज्य,पुणे,
३. कारागृह उपमहानिरीक्षक (पूर्व विभाग), नागपूर,
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, नागपूर,
५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य, नागपूर,
६. कोषागार अधिकारी, नागपूर,
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर,
८. सार्वजनिक बांधकाम विभाग, (इमारती-२) मंत्रालय,मुंबई-३२,
९. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-३२,
१०. निवडनस्ती, (तुरुंग-२)